**समग्र शिक्षा अंतर्गत व्यवस्थापन व कार्यक्रमांतर्गत करार पद्धतीने कार्यरत कर्मचा-यांना मानधनातील १० टक्के वाढीची रक्कम अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२२/प्र.क्र.२८९/ एसडी-१**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२**
**दिनांक :- २७ फेब्रुवारी, २०२५**

**संदर्भ :-**

१) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे दि.२२.०८.२०२४ व दि.१०.१०.२०२४ रोजीचे पत्र

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. समग्र २०२२/प्र.क्र.२८९/ एसडी-१, दि.१८.०९.२०२३, दि.२७.१२.२०२४

३) वित्त विभागाचे क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४ चे परिपत्रक

**प्रस्तावना :-**

सर्व शिक्षा अभियानाची अंमलबाजवणी सन २०००-२००१ पासून देशभरात झाली आहे. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दि.१८.०१.२००२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व शिक्षा अभियानाची अंमलबजावणी राज्यात करण्याचा निर्णय घेण्यात आला व सदर अभियानाच्या अंमलबजावणीची जबाबदारी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे सोपविण्यात आली. सदर संस्था ही "सोसायटीज रेजिस्ट्रेशन ॲक्ट, १८६० व मुंबई विश्वस्त अधिनियम, १९५०" अन्वये पंजीकृत करण्यात आली आहे. सर्व शिक्षा अभियान, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान व शिक्षक शिक्षण या पूर्वाश्रमीच्या योजना एकत्र करुन गुणवत्तापूर्ण व दर्जेदार शिक्षण देण्यासाठी शालेय शिक्षणासाठी एकत्रित योजना म्हणून समग्र शिक्षा ही योजना दि.०१.०४.२०११ ते दि.३१.०३.२०२६ या कालावधीसाठी पुढे सुरु ठेवण्यास मान्यता दिली आहे.

२. सर्व शिक्षा अभियानाच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांनी निर्गमित केलेल्या मॅन्युअल ऑन फायनान्शिअल मॅनेजमेंट ॲण्ड प्रोक्युअरमेंट, २००४ मधील नियम ३७ (मॅनेजमेंट कॉस्ट) अन्वये सर्व शिक्षा अभियानांतर्गत पदांना मंजुरी देताना नवीन पदनिर्मिती करु नये तसेच निर्माण केलेली पदे केवळ कंत्राटी अथवा प्रतिनियुक्तीने भरण्यात यावीत. सदर पदे भरल्यामुळे सोसायटी अथवा राज्य शासनावर कायमस्वरुपी दायित्व येता कामा नये, असे नमूद केले आहे. सदर कंत्राटी कर्मचा-यांना केंद्र शासनाने मंजूर केलेल्या एकक दराने मानधन अनुज्ञेय आहे. या कर्मचा-यांच्या मानधन वाढीच्या प्रस्तावास केंद्र शासनाने मंजूरी दिलेली नाही, यास्तव सदर खर्च राज्य शासनाला करावा लागणार आहे. सबब, समग्र शिक्षा अंतर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचा-यांच्या मानधनात १० टक्के वाढ करण्याच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे.

सद्यस्थितीत **समग्र शिक्षा अंतर्गत व्यवस्थापन व कार्यक्रमांतर्गत करार पद्धतीने** ५६४३ कर्मचारी कार्यरत आहेत. या **कर्मचा-यांना मानधनातील** १० **टक्के वाढीची रक्कम अदा करण्याचा प्रस्ताव संदर्भ**

**क्र.१ येथील पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्या**नुषंगाने उक्त निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

समग्र शिक्षा अंतर्गत व्यवस्थापन व कार्यक्रमांतर्गत करार पद्धतीने कार्यरत कर्मचा-यांना त्यांच्या मानधनातील माहे जानेवारी, २०२५ ते मार्च, २०२५ या कालावधीकरीता १० टक्के वाढीच्या फरकाची रक्कम अदा करण्यासाठी रु.५,०५,७७,१२९/- (अक्षरी रु. पाच कोटी पाच लक्ष सत्त्याहत्तर हजार एकशे एकोणतीस फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के), (२२०२ आय ६१२) या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक परिषद, मुंबई यांचेकडे सुपूर्त करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख शाखा/ लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तर सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरीत करुन समग्र शिक्षा या योजनेच्या SNA खात्यात जमा करावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय/परिपत्रक दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरीताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.२२/१४७१, दि.१३.०१.२०२५ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१२७/व्यय-५, दि.०३.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२७१२०७००८९२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.02.27 12:12:25 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यापालाचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष / सभापती, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
४. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई
६. मा. विधान सभा / विधान परिषद, विधान भवन, मुंबई (सर्व)
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
११.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
१४.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३
१५.सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१६.अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१७. उप सचिव, वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१८. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.उप सचिव, (१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०.उप सचिव, वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
२१.अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२.अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२३.निवड नस्ती (एसडी-१)